**जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, पुणे यांच्या आस्थापनेवरील उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक, ई-फेरफार हे पद श्रेणीउन्नत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्था-०९२२/प्र.क्र.२२९/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २३ मार्च, २०२३.

**संदर्भ**:- १) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र.आस्था/प्रपत्र पदोन्नती/२०२२ दिनांक २५ ऑगस्ट,२०२२
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.ईएसटी-२०१८/प्र.क्र.१२६/ई-८, दिनांक ८ सप्टेंबर,२०२०
३) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र. पदोन्नती-२०२२/प्र.क्र.३२/ई-१. दिनांक १८ ऑगस्ट,२०२२ व दिनांक ०२ नोव्हेंबर,२०२२
४) शासन आदेश क्र.महसूल व वन विभाग, टिआरएफ-१२२१/प्र.क्र.१६६/ई-२ दिनांक २१ जानेवारी,२०२२.

**प्रस्तावना:-**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे यांच्या आस्थापनेवरील उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक, ई-फेरफार या पदावर कार्यरत श्रीमती सरिता नरके यांची शासन आदेश महसूल व वन विभाग दि.१८.०८.२०२२ अन्वये उपजिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या पदावरुन अपर जिल्हाधिकारी या संवर्गात पदोन्नती झाली आहे. सबब, भूमि अभिलेख विभागाच्या आस्थापनेवर वर्ग करण्यात आलेले उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार हे पद अपर जिल्हाधिकारी संवर्गात श्रेणीउन्नत करुन सदर पदावर श्रीमती सरिता नरके यांची प्रपत्र पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांनी त्यांचे पत्र दिनांक २५.०८.२०२२ अन्वये विनंती केली होती. त्यानुसार उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार हे पद अपर जिल्हाधिकारी संवर्गात श्रेणीउन्नत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख (महाराष्ट्र) पुणे यांच्या आस्थापनेवरील उपजिल्हाधिकारी तथा राज्य समन्वयक ई-फेरफार (वेतनश्रेणी एस-२० रु.५६१००-१७७५००) हे पद अपर जिल्हाधिकारी (वेतनश्रेणी एस-२५ रु.७८८००-२०९२००) या पदात श्रेणीउन्नत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. श्रीमती सरिता नरके यांची संदर्भ क्रमांक ३ येथील शासन आदेश दि.०२.११.२०२२ अन्वये अप्पर जिल्हाधिकारी तथा राज्य संचालक (ई-फेरफार) प्रकल्प, जमाबंदी आयुक्त कार्यालय,पुणे या

पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. हे लक्षात घेता, जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, पुणे या कार्यालयातील उपजिल्हाधिकारी तथा राज्य संचालक (ई-फेरफार) प्रकल्प हे अप्पर जिल्हाधिकारी पदात श्रेणीउन्नत केलेले पद हे श्रीमती सरिता नरके या पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहिल. त्यानंतर हे पद आपोआप उपजिल्हाधिकारी पदावर श्रेणी अवनत होईल.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२७६/२०२२/सेवा-९, दि.२२.९.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या त्या कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२३१३५१३७५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.03.23 13:58:34 +05'30'

**( संजय बनकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
३. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
४. श्रीमती सरिता नरके,अपर जिल्हाधिकारी तथा राज्य संचालक (ई-फेरफार) प्रकल्प, जमाबंदी आयुक्त कार्यालय,पुणे.
५. कक्ष अधिकारी (कार्यासन/सेवा ९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती कार्यासन/ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.